उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय/अशासकीय अनुदानित/विनाअनुदानित/ विद्यापीठ विभाग/विद्यापीठ संचलित संस्थांमधील शिक्षणशास्त्र अभ्यासक्रमासाठी व अशासकीय अनुदानित/विद्यापीठ विभाग/ विद्यापीठ संचलित संस्थांमधील शारिरीक शिक्षण अभ्यासक्रमांच्या प्रवेशासाठी अर्हता, शर्ती आणि सामायिक प्रवेश परीक्षा व केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेची नियमावली लागू करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीईटी-२०१७/प्र.क्र.१२५/मशि-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १२ मे, २०१७.

**वाचा :-**

१) सन २०१५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक २८,
२) शासन अधिसूचना क्र.बीएङ-४६१५/प्र.क्र.२१०/मशि-२, दि.२१.०१.२०१६ व दुरुस्ती क्रमांक सीईटी-२०१६/प्र.क्र.१२८/मशि-२, दि.०५.०५.२०१७,
३) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.सीईटी-२०१५/प्र.क्र.४४०/मशि-२, दि.२८.०१.२०१६,
४) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.सीईटी-२०१६/प्र.क्र.८४/मशि-२, दि.०७.०४.२०१६,
५) शासन अधिसूचना क्र.बीएङ-४६१६/प्र.क्र.१(भाग-२)/मशि-२, दि.०५.०५.२०१७,
६) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. बीएङ-४६१६/प्र.क्र.१/मशि-२, दि.११.०५.२०१६.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.२ येथील दि.१६.०६.२०१५ च्या अधिसूचनेद्वारे लागू करण्यात आलेल्या महाराष्ट्र विनाअनुदानित खाजगी व्यावसायिक शैक्षणिक संस्था (प्रवेश व शुल्क यांचे विनियमन) अधिनियम, २०१५ मधील कलम २ (द) अनुसार विभागाच्या अखत्यारितील शिक्षक प्रशिक्षण अभ्यासक्रम व्यावसायिक अभ्यासक्रम म्हणून घोषित केले आहेत. सदर अभ्यासक्रमांमध्ये शिक्षणशास्त्र (बी.एङ व एम.एङ) अभ्यासक्रमांचा व शारिरीक शिक्षण (बी.पी.एङ व एम.पी.एङ) अभ्यासक्रमांचा समावेश करण्यात आलेला आहे. त्यानुसार राज्यातील शासकीय/अशासकीय अनुदानित/विनाअनुदानित/कायम विनाअनुदानित महाविद्यालयांतील शिक्षणशास्त्र (बी.एङ व एम.एङ) अभ्यासक्रमांचे व शारिरीक शिक्षण (बी.पी.एङ व

एम.पी.एड) अभ्यासक्रमांचे प्रवेश राज्यस्तरीय सामायिक प्रवेश परीक्षेद्वारे व केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेद्वारे करण्यास संदर्भ क्र.३ येथील दि.०४.१२.२०१५ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच, राज्यातील अकृषि विद्यापीठांमध्ये सुरु असणाऱ्या विधी अभ्यासक्रमांचे प्रवेश, आयुक्त, राज्य सामायिक प्रवेश परीक्षा कक्ष यांच्यामार्फत एक खिडकी पध्दतीने राज्यस्तरीय सामायिक प्रवेश परीक्षेद्वारे व केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेद्वारे करण्यास संदर्भ क्र.६ येथील दि.०७.०४.२०१६ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. संदर्भ क्र.५ येथील दि.०५.०५.२०१७ च्या अधिसूचनेन्वये राज्यातील कायम विनाअनुदानित शिक्षणशास्त्र (बी.एड व एम.एड) अभ्यासक्रमांची व शारिरीक शिक्षण (बी.पी.एड व एम.पी.एड) अभ्यासक्रमांची सामायिक प्रवेश परीक्षा व केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेद्वारे प्रवेशाबाबतची नियमावली प्रसिध्द करण्यात आलेली आहे.

उपरोक्त अधिसूचना व प्रवेश नियमांच्या धर्तीवर व संदर्भ क्र. २ येथील तरतुदीनुसार व संदर्भ क्र.६ येथील दि.११.०५.२०१६ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करुन, उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय/अशासकीय अनुदानित/विना अनुदानित/विद्यापीठांच्या/विद्यापीठ संचलित संस्थांच्या शिक्षणशास्त्र (बी.एड व एम.एड) अभ्यासक्रमांचे व शारिरीक शिक्षण (बी.पी.एड व एम.पी.एड) अभ्यासक्रमांचे प्रवेश हे सामायिक प्रवेश परीक्षेद्वारे व केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेद्वारे करण्याबाबतची सुधारित नियमावली प्रसिध्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून दि.२१.०१.२०१६ रोजीच्या अधिसूचनेद्वारे व दि.०५.०५.२०१७ रोजीच्या दुरूस्तीद्वारे कायम विनाअनुदानित शिक्षक प्रशिक्षण अभ्यासक्रम (बी.एड, बी.पी.एड, एम.एड, एम.पी.एड) अभ्यासक्रमांच्या प्रवेशासाठी अधिसूचित केलेल्या अर्हता व शर्ती, उच्च शिक्षण संचालनालयाच्या अखत्यारितील शासकीय/अशासकीय अनुदानित/विनाअनुदानित व राज्यातील अकृषि विद्यापीठांमधील शिक्षक प्रशिक्षण विभाग व विद्यापीठ संचलित संस्थामधील शिक्षक प्रशिक्षण अभ्यासक्रमांच्या (बी.एड, बी.पी.एड, एम.एड, एम.पी.एड) प्रवेशासाठी या आदेशान्वये लागू करण्यात येत आहेत.

२. दि.०५.०५.२०१७ रोजीच्या अधिसूचनेतील प्रवेश प्रक्रियेचा, सोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद बदलांसह अवलंब करुन शासकीय/अशासकीय अनुदानित/विनाअनुदानित व राज्यातील अकृषि विद्यापीठांमधील शिक्षक प्रशिक्षण विभाग व विद्यापीठ संचलित संस्थामधील शिक्षक प्रशिक्षण अभ्यासक्रमांचे प्रवेश हे सक्षम प्राधिकारी म्हणून आयुक्त, राज्य सामायिक प्रवेश परीक्षा कक्ष यांच्यामार्फत सामायिक प्रवेश परीक्षेद्वारे व केंद्रीभूत प्रवेश परीक्षेद्वारे एक खिडकी पध्दतीने संदर्भ क्र.३ व ४ येथील शासन निर्णयान्वये जाहीर केल्याप्रमाणे करण्यात येतील.

३. सदरच्या शासकीय/अशासकीय अनुदानित व राज्यातील अकृषि विद्यापीठांमधील अनुदानित शिक्षक प्रशिक्षण विभाग व विद्यापीठ संचलित संस्थामधील अनुदानित शिक्षक प्रशिक्षण अभ्यासक्रमांच्या प्रवेशासाठी उपलब्ध जागांचे विभाजन सोबतच्या जोडपत्रातील Annexure-A मध्ये नमूद केल्याप्रमाणे असेल. तसेच, विनाअनुदानित शिक्षक प्रशिक्षण विभाग/अभ्यासक्रमांच्या प्रवेशासाठी उपलब्ध जागांचे विभाजन सोबतच्या Annexure-B मध्ये नमूद केल्याप्रमाणे असेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१२१५२४०३११०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rohini Bhalekar

Digitally signed by Rohini Bhalekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=440c600559857f4234e969f892346c88247ac81346a1b7229bf9917deb7bce48, cn=Rohini Bhalekar
Date: 2017.05.12 15:21:19 +05'30'

**( रोहिणी भालेकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, राज्य सामायिक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, ३०५, शासकीय तंत्रनिकेतन इमारत, ४९, खेरवाडी, अलियावर जंग मार्ग, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१,
२. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. सर्व सहसंचालक, उच्च शिक्षण (संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत)
४. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
७. प्राचार्य, सर्व अशासकीय अनुदानित/विना अनुदानित/कायम विना अनुदानित उच्च महाविद्यालये (संचालक, उच्च शिक्षण यांच्यामार्फत),
८. निवड नस्ती/मशि-२.

## Annexure-A

Allocation of Seats for admissions to the Professional Undergraduate Degree Courses in Education & Physical Education (B.Ed. & B.P.Ed.) into the Government and Aided Professional Educational Institutions and Aided Undergraduate/ Post-graduate Degree Courses in Education & Physical Education into Non-Agricultural Universities. (Annexure to the Government resolution No. B.Ed.-2017/C.R.125/C.E.2, Dated 12.5.2017)

| Sr. No. | Type of Institution | No. of Seats-as % of Sanctioned Intake | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | CAP Seats | | | |
| | | Maharashtra State (M.S.) Candidates | All India Seats | Minority Quota | 5% Quota for NRI, PIO, Foreign Nationals. |
| 1 | Government B.Ed. institution | 90% MH Seats $ (70% HU 20% OHU) | 5%^ | Nil | 5% |
| 2 | Government Aided B.Ed. institution | **Autonomous** 90% MH Seats $ (70% HU 20% OHU) **Non-Autonomous** 90% MH Seats $ (70% HU 20% OHU) | 5%^ | Nil | 5% |
| 3 | Government Aided Minority B.Ed. institution | **Autonomous*** 40% HU Seats **Non-Autonomous** * 40% HU Seats | 5%^ | Minimum 50%@ | 5% |
| 4 | University B.Ed./M.Ed. Department/Courses (Government Aided) | 90% MH Seats $ (70% HU 20% OHU) | 5%^ | Nil | 5% |
| 5 | Government Aided B.P.Ed. institution | **Autonomous** – 80% MH Seats $ (60% HU 20% OHU) **Non-Autonomous-** 80% MH Seats $ (60% HU 20% OHU) | 15%^ | Nil | 5% |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 6 | Government Aided Minority B.P.Ed. institution | **Autonomous*** 30% HU **Non-Autonomous*-** 30 % HU | 15%^ | Minimum 50%@ | 5% |
| 7 | University B.P.Ed./M.P.Ed. Department/ Courses (Government Aided) | 80% MH Seats $ (60% HU, 20% OHU) | 15%^ | Nil | 5% |

CAP Seats = Sanctioned Intake

$ M.S. Seats = CAP Seats – (All India Seats + Minority Quota)

%- Percentage

* The seats excluding the Minority Quota and shall be filled in the stipulated percentage from the Maharashtra Candidature Candidate.

@ These are the minimum percentage of seats to be filled in the Minority Institution through CAP, this may be extended up to 100%. However before commencement of the CAP, such Institution shall declare and inform to the Competent Authority, the maximum percentage of minority quota to be filled in their institution.

^ One seat reserved for Jammu and Kashmir Migrant Candidates. This seat shall be filled by the Competent Authority as per the policy of the Government. If the seat remains vacant, it shall be filled through All India Candidature candidate.

## Annexure-B

Allocation of Seats for admissions to the Professional Undergraduate/Post-graduate Degree Courses in Education & Physical Education (B.Ed., M.Ed., B.P.Ed., M.P.Ed.) into the Unaided (Vina-Anudanit) Professional Educational Institutions and Unaided/Self-Financed Undergraduate/ Post-graduate Degree Courses in Education & Physical Education into Non-Agricultural Universities. (Annexure to the Government resolution No. B.Ed.-2017/C.R.125/C.E.2 , Dated 12.5.2017)

| Sr. No. | Type of Institution | No. of Seats-as % of Sanctioned Intake | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | CAP Seats | | | |
| | | Maharashtra State (M.S.) Candidates | All India Seats | Minority Quota | 5% Quota for NRI, PIO, Foreign Nationals. |
| 1 | Unaided* (Vina-anudanit) B.Ed. institution | **Autonomous** – 90% MH Seats $ (70% HU 20% OHU) **Non-Autonomous-** 90% MH Seats $ (70% HU 20% OHU) | 5%^ | Nil | 5% |
| 2 | Unaided* (Vina-anudanit) Minority B.Ed. institution | **Autonomous*** 39% HU Seats **Non-Autonomous** * 39% HU Seats | 5%^ | 51%@ | 5% |
| 3 | Unaided* (Vina-anudanit) B.P.Ed. institution | **Autonomous** – 80% MH Seats $ (60% HU 20% OHU) **Non-Autonomous-** 80% MH Seats $ (60% HU 20% OHU) | 15%^ | Nil | 5% |
| 4 | Unaided* (Vina-anudanit) Minority B.P.Ed. institution | **Autonomous*** 29% HU **Non-Autonomous*-** 29 % HU | 15%^ | 51%@ | 5% |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 5 | Unaided/Self-Financed B.Ed. /M.Ed. Courses run by university | 90% MH Seats $ (70% HU 20% OHU) | 5%^ | Nil | 5% |
| 6 | Unaided/Self-Financed B.P.Ed. /M.P.Ed. Courses run by university | 80% MH Seats $ (60% HU, 20% OHU) | 15%^ | Nil | 5% |

CAP Seats = Sanctioned Intake

$ M.S. Seats = CAP Seats – (All India Seats + Minority Quota)

%- Percentage

* The seats excluding the Minority Quota and shall be filled in the stipulated percentage from the Maharashtra Candidature Candidate and All India Candidature Candidate.

@ These are the minimum percentage of seats to be filled in the Minority Institution through CAP, this may be extended up to 100%. However before commencement of the CAP, such Institution shall declare and inform to the Competent Authority, the maximum percentage of minority quota to be filled in their institution.

^ One seat reserved for Jammu and Kashmir Migrant Candidates. This seat shall be filled by the Competent Authority as per the policy of the Government. If the seat remains vacant, it shall be filled through All India Candidature candidate.